मजूर सहकारी संस्थांच्या कामाच्या
सवलतीत वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. सीएटी २०१७/प्र.क्र.१०३/इमा.२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २३/०७/२०१८

**वाचा-** १) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.एलसीएस १०८३/८४७१४/७९८/मिव्य-३, दि.५ डिसेंबर १९८४
२) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.एलएबी १०९८/प्र.क्र.१६४/इमा.२, दि.११ जानेवारी २०००
३) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.सीएटी ०१/०५/प्र.क्र.२६/इमा-२, दि.३१.३.२००५
४) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.सीएटी ०७/०६/प्र.क्र.९४/इमा-२, दि.१६.११.२००६

**प्रस्तावना-**

मजूर सहकारी संस्थांना सार्वजनिक बांधकाम विभाग व जलसंपदा विभागातील बांधकामाबाबत उपरोक्त दिनांक १६.११.२००६ च्या शासन निर्णयान्वये सवलती देण्यात आलेल्या आहेत. सदर सवलतीमध्ये वाढ करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. आता मजूर सहकारी संस्थांना कामे देण्याच्या सवलतीत खालील निर्देशित केल्याप्रमाणे वाढ करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**शासन निर्णय-**

**१) कामे देण्याची मर्यादा (स्थापत्य कामे)**

अ) सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २६/११/२०१४ रोजीच्या शासन निर्णयानुसार रु.३.०० लक्षवरील रकमेच्या कामांकरीता ई-निविदा प्रणाली अवलंबवावयाची असल्याने मजूर सहकारी संस्थांना त्यांचे कोटयातील रु.३.०० लक्ष पर्यंतची कामे निविदा न मागविता सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.एलसीएस १०७७/५५९३३/डेस्क-२७ डी, दिनांक ३०.३.७९ नुसार विहित केलेल्या पध्दतीनुसार देण्यात यावीत. तसेच या संस्थांना त्यांचे कोटयातील रु.३.०० लक्ष वरील ई-निविदा प्रणाली राबवून देण्यात येणा-या कामांच्या किंमतीच्या मर्यादेत वाढ करण्यात येत आहे.
ब) कामे देण्यासाठी मजूर सहकारी संस्थांची सुधारित वर्गवारी पुढीलप्रमाणे राहील.

"अ" वर्ग उच्चतम पात्रता रु.१५,००,०००/- ऐवजी रु.३०,००,००० (रु.३० लक्ष)

"ब" वर्ग उच्चतम पात्रता रु.७,५०,००० ऐवजी रु.१५,००,००० (रु.१५ लक्ष)

क) मजूर सहकारी संस्थांना वर्षभरात एकूण रु.५० लक्ष मर्यादेपर्यंत कामे घेता येत होती. आता या मर्यादेत वाढ करण्यात येत असून, या संस्थाना वर्षभरात एकूण रु.१०० लक्ष मर्यादेपर्यंत कामे घेता येतील. नवीन मजूर सहकारी संस्थेस प्रथमत: रु.१५ लाखाचे काम यशस्वीरित्या पूर्ण केल्यावर रु.३० लक्षपर्यंतची ३ वा अधिक कामे मिळून एकूण रु.१०० लक्षची कामे प्रतिवर्षी देता येतील.

कार्यकारी अभियंता यांनी मजूर सहकारी संस्थेस कामाचे कार्यादेश देणेपूर्वी संबंधित मजूर सहकारी संस्थेच्या पासबुकात नोंद घ्यावी आणि त्या संस्थेच्या पासबुकातील नोंदी पासून एका वर्षात एकूण रु.१०० लाखापेक्षा जास्त रकमेची कामे दिली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

**२) विद्युत कामे-**

अ) विद्युत व यांत्रिकी मजूर संस्थांना आता रु.२५,०००/- ऐवजी रु.५०,०००/- पर्यंतची कामे देण्यात यावीत.

ब) ज्या विद्युत आणि यांत्रिकी मजूर सहकारी संस्थंचे कार्य २ वर्षाच्या अनुभवनानंतर समाधानकारक आढळून येईल अशा संस्थांना निविदा न बोलाविता कामे देण्याची मर्यादा रु.२५,०००/- ऐवजी रु.५०,०००/- पर्यंत वाढविण्यात येत आहे.

३) सवलतीमध्ये वरीलप्रमाणे केलेल्या वाढी लक्षात घेऊन सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.एलएबी १०९८/प्र.क.१६४/इमा.२, दिनांक ११ जानेवारी २००० मधील अनुक्रमांक ४ मधील इतर तरतूदीमध्ये खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे.

परिच्छेद ३ मधील (बयाणा रक्कम) रु.१५,००,०००/- ऐवजी रु.३०,००,०००/- वाचावे.

परिच्छेद ४ (अ) मधील (सुरक्षा अनामत) रु.१५,००,०००/- ऐवजी रु.३०,००,०००/- वाचावे.

परिच्छेद ५ (पतदारी प्रमाणपत्र) रु.१५,००,०००/- ऐवजी रु.३०,००,०००/- वाचावे.

परिच्छेद ६ (६) मधील (कामाचे वाटप) रु.७,५०,०००/- ऐवजी १५,००,०००/- वाचावे.

आणि रु.१५,००,०००/- ऐवजी रु.३०,००,०००/- वाचावे.

परिच्छेद १० मधील (कामाचे भाग पाडणे) रु.१५,००,०००/- ऐवजी ३०,००,०००/- वाचावे.

परिणामी दिनांक ३१ मार्च २००५ च्या शासन निर्णयातील तरतूदीमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

४) रुपये ३० लक्ष किंमतीपर्यंतच्या कामांचे वाटप मजूर सहकारी संस्था, सुशिक्षित बेरोजगार अभियंता व पात्र नोंदणीकृत नियमित कंत्राटदार यांच्यामध्ये ३३:३३:३४ या प्रमाणात करण्यात यावे.

५) मजूर सहकारी संस्थांच्या वर्गीकरणाचे नूतनीकरण ३ वर्षा ऐवजी ५ वर्षानी करण्यात येईल.

६) उपरोक्त दिनांक ११ जानेवारी २००० व ३ मार्च २००५ व दि.१६/११/२००६ च्या शासन निर्णयातील इतर तरतूदी कायम राहतील.

सदर आदेश वित्त विभाग, जलसंपदा विभाग, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, सहकार विभाग, नगर विकास विभाग, कृषि विभागाच्या सहमतीने व आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०७२४१२०४२५३०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Uttarwar

Digitally signed by Sanjay Uttarwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=cab21a54ad660ded981a3eca61380e321e245c3a783fe22e29d3e1080185a683, serialNumber=23844598153e02b0343bb8841e656191857a573661abb05577db911eb5e3ded7, cn=Sanjay Uttarwar
Date: 2018.07.24 12:05:08 +05'30'

**( सं.मु.उत्तरवार )**

**कार्यासन अधिकारी**

**प्रत-**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (सा.बां.)/जलसंपदा यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री (सा.बां.)/जलसंपदा यांचे खाजगी सचिव
४) वित्त विभाग/सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५) महालेखापाल- १, मुंबई/महालेखापाल- २, नागपूर
६) सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७) सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८) सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय
१०) निवड नस्ती (इमा-२).